अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे यांच्या कार्यालयाच्या इमारतीच्या मालमत्ता करापोटी २२११ ००३१ या योजना संकेतांकांतर्गत १४ भाडेपट्टी व कर खाली डिसेंबर २०१६ च्या अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे रू.२०,०००/- इतका निधी मंजूर करणेबाबत

# महाराष्ट्र शासन

## सार्वजनिक आरोग्य विभाग

## शासन निर्णय क्रमांकः पुरमा-२०१६/८००८/प्र.क्र. ७९८/कु.क.

१० वा मजला, गो.ते.रुग्णालय संकूल इमारत,
लो.टि.मार्ग ,नवीन मंत्रालय,मुंबई-४०० ००१
तारीख: ०३ मार्च, २०१७

वाचा -

१) **शासन परिपत्रक वित्त विभाग क्रमांक : पूरक -२०१६/प्र.क्र.२०१/अर्थसंकल्पक - ३ ,दि.०४ जानेवारी, २०१७**
२) **शासन परिपत्रक सार्वजनिक आरोग्य विभाग क्रमांक : पूरमा-२०१६/प्र.क्र.२५३ /अर्थसंकल्प, दि.१० जानेवारी, २०१७**

**प्रस्तावना -**

संदर्भ क्र.१ अन्वये महाराष्ट्र (तृतीय पुरवणी) विनियोजन अधिनियम,२०१६ (सन २०१६ चा महाराष्ट्र अधिनियम क्रमांक -१) म्हणून महाराष्ट्र राजपत्र असाधारण, भाग-४,दि. ०२ जानेवारी, २०१६ यामध्ये प्रसिध्द करण्यात आले आहे. संदर्भ क्र. १ अन्वये अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे यांच्या कार्यालयाच्या इमारतीवरील मालमत्ता करापोटी २२११ ००३१ या योजना संकेतांकांतर्गत १४ भाडेपट्टी व कर खाली मंजूर झालेले पुरक अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय-**

सन २०१६-१७ या वित्तीय वर्षासाठी अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे यांच्या कार्यालयाच्या इमारतीच्या मालमत्ता करापोटी अतिरिक्त आवश्यक निधी रू. २०,०००/- ( अक्षरी रूपये वीस हजार फ़क्त) इतक्या निधी खर्चास वित्त विभागाच्या संदर्भ क्र. १ मधील नमूद शासन

परिपत्रकातील तरतूदींच्या पूर्ततेच्या अधीन राहून निधी खर्चास शासन मंजूरी देत आहे. सदरचा मंजूर निधी नियंत्रक अधिकारी म्हणून अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे यांच्याकडे पुढील लेखाशीर्षामध्ये वितरीत करण्यात येईल.

**लेखाशीर्ष**

आर- १

२२११- कुटुंब कल्याण

(००)

००१, संचालन व प्रशासन-

(०१) राज्य कुटुंब कल्याण केंद्र

१०० टक्के केंद्र पुरस्कृत योजना---

(०१)(०२) राज्य कुटुंब कल्याण केंद्र

(२२११ ००३१)

१४, भाडे पट्टी व कर

सन २०१६-१७ या आर्थिक वर्षात वितरीत केलेला उपरोक्त निधी /अनुदान आहरण व संवितरण अधिकाऱ्यांना खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून तातडीने वितरीत करण्यात यावा :-

१) ज्या उद्देशासाठी निधी/अनुदान मंजूर आहे त्या व्यतिरिक्त इतर उद्देशासाठी खर्च करण्यात येणार नाही. तसेच इतर लेखाशिर्षाखाली वळविता येणार नाही. त्यापेक्षा अधिक निधी खर्च होणार नाही त्याची दक्षता घ्यावी.

२) स्थानिक स्वराज्य संस्थांना वेतनेतर अनुदान वितरीत करण्यापूर्वी सदर संथांकडून राज्य शासनाकडे येणे असणाऱ्या रकमांचा आढावा घेण्यात यावा व त्या वसूल करुन उर्वरीत अनुदान वितरीत करण्यात यावे.

३) खाजगी स्वयंसेवी संस्थांना अनुदान उपलब्ध करुन देताना वित्तीय अधिकार नियम पुसितका १९७८, भाग-१, उपविभाग एक मधील अनुक्रमांक २७ नियम १४९ प्रमाणे सक्षम अधिकाऱ्याची मान्यता घेऊन अनुदान अदा करावे.

४) ज्या तरतूदी वितरणासाठी प्रशासकीय मान्यता आदेशाची आवश्यकता आहे अशा तरतूदी वितरीत करताना भाग-१, उपविभाग तीन, अनुक्रमांक-चार,नियम २७ (२) अन्वये प्रदान केलेल्या अधिकाराप्रमाणे सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने आदेश निर्गमित झाल्यानंतर अनुदान वितरीत करावे.

५) विविध शासकीय/प्रशासकीय संस्थांना तसेच अनुदानित संस्थांना सहायक अनुदाने मंजूर करुण्यापूर्वी त्यांचेकडून पूर्वीच्या अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे नियंत्रक अधिकाऱ्यांनी प्राप्त करुन घ्यावी. पूर्वी केलेल्या अनुदानाचा पूर्ण विनियोग झाल्याशिवाय पुढील अनुदान वितरीत करण्यात येऊ नये.

६) वैयक्तिक लाभार्थी यांची प्रदाने इलेक्ट्रोनिक्स क्लिअरन्स सिस्टीम (ECS) नेच अदा करावी.

७) ३ महिन्यापूर्वी शासन स्तरावर वितरीत केलेल्या अनुदानापैकी ७५ टक्के अनुदानाचे उपयोगिता प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय निधी वितरीत करु नये

८) कोषागारातून आहरीत करण्यात येणाऱ्या लेखाशिर्षाखालील १ वर्षावरील संक्षिप्त देयके प्रलंबित नसावे.

९) आहरीत करावयाचा निधी PLA अथवा बॅक खात्यात जमा न करता खर्च होणार आहे असे आहरण व संवितरण अधिकाऱ्याने प्रमाणित करावे.

१०) विभागाद्वारे करण्यात येणारा संगणकीकरण संदर्भातील खर्च शासनाचे दरपत्रकानुसारच करण्यात यावा. आवश्यक तेथे माहिती व तंत्रज्ञान विभागाची मान्यता प्राप्त करु घेण्यात यावी.

११) साहित्य खरेदीची प्रक्रिया पूर्ण करुन पुरवठादार निश्चित झाल्याशिवाय खरेदीची देयके कोषागारातून आहरित करण्यात येऊ नये. साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे इलेक्ट्रोनिक्स क्लिअरन्स सिस्टीम (ECS) ने अदा करण्यात यावा. दरकरार/निविदेमध्ये विवक्षित तरतूद असल्याशिवाय पुरवठादारास अग्रिम अदा करण्यात येऊ नये.

१२) यापूर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखा परिक्षण झाले असून त्या संदर्भात लेखा परीक्षण/महालेखापाल यांचे आक्षेप नसल्याचे आहरण व संवितरण अधिकाऱ्याने प्रमाणित करावे

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. २८ /१४७२, दि. ०८.०२.२०१७ अन्वये आणि वित्त विभागाच्या सहमतीने वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-

२०१५/प्र.क्र.८५/अर्थ-३ दि.१७ एप्रिल, २०१५ आणि अनौ. संदर्भ. क्र.२९७/अर्थ-९, दि. १८.०९.२०१७ अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०३१०४४३८९४१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Tulshiram M Shinde

Digitally signed by Tulshiram M Shinde
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Tulshiram M Shinde
Date: 2017.03.03 12:17:04 +05'30'

**(तु.मु.शिंदे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. महालेखापाल, महाराष्ट्र- ½ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) मुंबई/ नागपूर.
२. अधिदान व लेखा अधिकारी, लेखा व कोषागारी , मुंबई .
३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी , मुंबई.
४. आयुक्त (कु.क.) तथा संचालक, रा. आ. अ., आरोग्य भवन, मुंबई.
५. अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
६. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
७. सहसंचालक ( अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
८. वित्त विभाग ( व्यय -१३ / अर्थसंकल्प-९), मंत्रालय, मुंबई
९. नियोजन विभाग( का- १४१२) मंत्रालय, मुंबई
१०. सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प/ लेखा), मंत्रालय, मुंबई.
११. निवडनस्ती (कु.क.)